ट्रॅक ॲण्ड ट्रेस प्रकल्पाकरीता System Integrator ची निवड करण्यासाठी तज्ञ समिती गठीत करणे.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - बीपीए ०११७/प्र.क्र.१३/राउशु-२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : २१ जानेवारी, २०१७**

**वाचा :- आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्र. एफएलआर ११२०१६ / महसूल उपाययोजना /५-ब, दि. ६.१.२०१७.**

**प्रस्तावना :-**

अवैध मद्य, मद्य व मद्यार्काची अवैध विक्री इत्यादी कारणांमुळे शासनास उत्पादन शुल्कापासून मिळणाऱ्या महसूलाची गळती थांबवून महसूल वाढीसंदर्भात उपाययोजना करण्याच्या अनुषंगाने ट्रॅक ॲन्ड ट्रेस प्रणाली विकसीत करणे, संगणक प्रणाली विकसीत करणे, मद्यार्काची ज्या वाहनातून वाहतूक करावयाची आहे त्या वाहनास GPS enabled Vehicle Tracking System व Electro-Mechanical Lock बसविणे, अशी वाहने मार्गस्थ असतांना त्याची माहिती नियंत्रण कक्षास मिळण्याकरिता Geo-Fenced प्रणाली बसविणे, आसवणींमध्ये CCTV कॅमेरे बसविणे, Data Analytics प्रणालीचा वापर करणे, मद्याच्या बाटल्यांचे व परिमाणांकरिता मद्याच्या बाटल्यांवर Unique Code लावणे इत्यादीकरिता या प्रकल्पामध्ये अंतर्भूत असलेल्या सर्व घटकांचा समन्वय रहावा म्हणून System Integrator ची आवश्यकता आहे. सदरहू System Integrator ची नियुक्ती खुल्या निविदेद्वारे करणे आवश्यक आहे. निविदेसाठी Request For Proposal तयार करण्याकरिता तज्ञ समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त प्रकल्पाकरिता System Integrator ची नियुक्ती करण्याकरितेच्या निविदेसाठी Request For Proposal तयार करण्याकरिता खालीलप्रमाणे तज्ञ समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई | अध्यक्ष |
| २ | सह सचिव (राज्य उत्पादन शुल्क) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३ | संचालक, माहिती तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४ | डॉ. पाठक, प्राध्यापक आयआयटी किंवा त्यांचे प्रतिनिधी | तज्ञ सदस्य |
| ५ | श्री. अजय सक्सेना, ओएसडी, मुन्फ्रा | तज्ञ सदस्य |

श्री. अजय सक्सेना हे निविदा प्रक्रीयेतील अटींबाबत तज्ञ म्हणून राहतील तर उर्वरित आयटी संबंधीत बाबींसाठी आयआयटी व माहिती तंत्रज्ञान विभाग हे तज्ञ म्हणून काम पाहतील.

२. Request For Proposal तयार करण्याकरिता **समितीने विचारात घ्यावयाच्या बाबी :-**

१. ट्रॅक ॲन्ड ट्रेस प्रणाली अंतर्गत फक्त तयार मद्यावर होलोग्राम लावण्यापेक्षा पुर्ण पुरवठा साखळी कच्च्या पदार्थांपासून ते तयार मद्य अंतिम ग्राहकांस पोहोचेपर्यंत प्रणालीत अंर्तभाव राहील.

२. विभागाने उपलब्ध साधन सामुग्रीचा वापर करुन तयार केलेली पुरवठा साखळी संगणक प्रणालीचा(End-to-End Supply Chain Management Software) वापर यापुर्ण प्रकल्पात करावयाचा आहे.

३. मद्य निर्मितीसाठी येणारा कच्चा पदार्थ म्हणजेच मद्यार्क हा ज्या वाहनांमधून वाहतूक होणार आहे त्या वाहनांमध्ये GPS enabled Vehicle Tracking System चा वापर करणे अनुज्ञप्ती धारकास बंधनकारक करणे.

४. मद्यार्काच्या वाहतूकीकरिता वापरण्यात येणाऱ्या टॅंकर्सच्या Intel आणि Outlet वर Electro-Mechanical Locks म्हणजेच डिजिटल कुलपे बसविणे बंधनकारक करणे सदरची डिजिटल कुलपे ही GPS enabled असल्याने नियंत्रण कक्षातून संदेश गेल्यानंतर बंद किंवा उघडली जातील.

५. मद्यार्काची वाहतूक होताना GPS enabled प्रणालीचा वापर होत असल्याने नियंत्रण कक्षात कायम वाहनांची अद्ययावत सद्यस्थिती समजून येईल. तसेच वाहन इच्छित स्थळी असल्याशिवाय त्यावरील डिजिटल कुलपे उघडली जाणार नाही. याचा अर्थ वाहन एका स्थळावरुन निघाल्यानंतर इच्छित स्थळी पोहोचेपर्यंत त्याचा मार्ग व त्याची स्थिती ही कायम Geo-fenced राहील. Geo-fenced क्षेत्राच्या बाहेर गेल्यास नियंत्रण कक्षास त्याची त्वरीत सुचना मिळणे.

६. मद्यार्क निर्मिती होणाऱ्या ठिकाणी तसेच इतर कच्चे पदार्थ निर्मिती होणाऱ्या ठिकाणी व मद्य निर्मिती होणाऱ्या ठिकाणी निश्चित केलेल्या सुयोग्य ठिकांणावर Smart CCTV कॅमेरे बसविणे बंधनकारक करणे. सदर CCTV कॅमेरे हे केंद्रीय नियंत्रण कक्षासोबत जोडण्यात येऊन इंटरनेटद्वारे त्यांचा Feed नियंत्रण कक्षात प्राप्त करणे.

७. केंद्रीय किंवा विभागीय स्तरावर नियंत्रण कक्ष उभारण्यात येऊन त्यात Central Business Unit उभारणे. आलेल्या सर्व माहितीचे संगणकीय Data Analytics प्रणाली तयार करणे.

८. तयार मद्याच्या परिमाणाबाबत पुरवठा साखळी प्रणालीतून कायम नियंत्रण राहणार असून प्रत्येक परिमाणाच्या बाटलीचे ट्रॅक ॲन्ड ट्रेस होण्याच्या दृष्टीने बाटलीवर दोन प्रकारचे unique code बसविणे.

अ) GS-१ code हा एक आंतरराष्ट्रीय क्रमांक असून भारत सरकारच्या वाणिज्य मंत्रालय अंतर्गत जीएस-१ इंडिया ही संस्था नोंदणीकृत आहे. सदर GS-१ code मद्य निर्माते तसेच मद्य आयातदार त्यांच्या लेबलवर छापण्यास बंधनकारक करणे.

आ) मद्याच्या बाटलीवर Excise Adhesive Label बसविणे, युनिक क्रमांक व होलोग्रामयुक्त Temper-proof लेबल छपाईकरिता इंडिया सिक्युरीटी प्रेस नाशिक यांना लेबल छपाईकरिता देणे.

३. समितीमध्ये समावेश असलेल्या खाजगी तज्ञ व्यक्तींना प्रति बैठक ठोक मानधन देण्याकरिता आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. समितीमध्ये समावेश असलेल्या खाजगी तज्ञ व्यक्तींना द्यावयाच्या मानधनाची एकूण रक्कम रु. ५.०० लक्षच्या मर्यादेत असावी.

५. प्रस्तूत प्रकरणी होणारा खर्च "मुख्य लेखाशिर्ष-२०३९ राज्य उत्पादन शुल्क, (००) ००१, संचालन व प्रशासन, (०१)- आयुक्तांचे कार्यालय, (०१)(०१)- आयुक्त कार्यालय-आस्थापना (दत्तमत २०३९ ००१४), १३- कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर केलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१२११३३९२३७७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Dilip J Shedmekhe

Digitally signed by Dilip J Shedmekhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5c22eb48b36977859e2ada92f034598cc0bc8511f0527da968636a6b9d9e10f0, serialNumber=5603a72ffdb1ef7b928b7c0a641bd1c8ef4b36aa6a8fd21a86271888a24f9803, cn=Dilip J Shedmekhe
Date: 2017.01.21 13:41:56 +05'30'

**( दि. ज. शेडमेखे )**

कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
३. मा. मंत्री (राउशु) यांचे खाजगी सचिव.
४. मा. राज्यमंत्री (राउशु) यांचे खाजगी सचिव.
५. अपर मुख्य सचिव (राउशु) यांचे स्वीय सहायक.
६. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. संचालक, माहिती तंत्रज्ञान विभाग, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई.
८. *डॉ. पाठक, आयआयटी,पवई मुंबई.
९. *श्री. अजय सक्सेना, ओएसडी,मुन्फ्रा.
१०. सह सचिव (राउशु) यांचे स्वीय सहायक.

* आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेमार्फत.